**रायगड जिल्ह्यातील पूर, दरड व भूकंप धोके सौम्यिकरण उपाययोजनेंतर्गंत करावयाच्या कामांसाठी निधी उपलब्ध करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**

**शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०१२/प्र.क्र.११६(भाग-१)/आव्यप्र-१**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- २८ डिसेंबर, २०१८

**वाचा :-** महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०१२/ प्र.क्र.११६(भाग-१)/ आव्यप्र -१, दि. ८.८.२०१७

**शासन निर्णय :-**

रायगड जिल्ह्यातील पूर, दरड व भूकंप धोके सौम्यिकरण उपाययोजनेंतर्गंत पथदर्शी प्रकल्पांतर्गत रायगड जिल्ह्यात करावयाच्या रचनात्मक कामांना प्रशासकीय मान्यता आणि त्यासाठी होणाऱ्या रु. २,११,५४,७४५/- (रुपये दोन काटी अकरा लाख चोपन्न हजार सातशे पंचेचाळीस फक्त) च्या खर्चास संदर्भाधिन शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यास अनुसरुन सदर कामे पूर्ण करण्यासाठी रु. १,५०,०००,००/- (रुपये एक कोटी पन्नास लाख फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीव्दारे (BDS) जिल्हाधिकारी, रायगड यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

वितरीत करण्यात आलेला निधी सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात खर्च करुन त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र दिनांक ३१.०३.२०१८ पर्यंत शासनास सादर करण्यात यावे.

निधी अखर्चित राहिल्यास सदर निधी तात्काळ शासनास परत करण्यात यावा.

या कामी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८०, सर्वसाधारण ८००, इतर खर्च (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च (९१) (०१) शोध ,बचाव कार्य व लोकांना सुरक्षित स्थळी हलविण्यासाठी आपत्तीच्या प्रतिसादासाठी (संपर्कसाधनासह) खरेदी करावयाची साधनसामुग्री (आपत्ती प्रतिसाद निधीच्या ५ टक्के मर्यादेपर्यंत) २२४५ २४९९ अंतर्गंत ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२२८१६५९४४४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrirang Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DMU/R AND R, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1b6e289fe7dcde27c972916398d8220a134ed8ebf6439e54d1927c5c4b28bec, cn=Shrirang Shripati Gholap
Date: 2018.12.28 17:10:50 +05'30'

**(श्रीरंग घोलप)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) जिल्हाधिकारी, रायगड
२) महालेखाकार, महाराष्ट्र-१, मुंबई
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
४) वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
५) लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
६) निवड नस्ती